**कोषागारातून रोखदेय अनुदान**

ग्रामीण भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारक
उपाययोजनांसाठी अनुदान-
आर्थिक वर्ष २०१०-२०११.
मागणी क्र.सी -६-२२४५-नैसर्गिक आपत्तीच्या
निवारणासाठी सहाय्य-योजनेतर

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्रमांक- टंचाई-१०१०/प्र.क्र.७९/ पापु-१४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २२ डिसेंबर , २०१०

वाचा :- १. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. एससीवाय-०५ /२०१०/प्र.क्र.५४/म-११
दि. ६ मे, २०१० व .१२ मे २०१०, ४ जून २०१०

२. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,शासन निर्णय क्र. टंचाई-१०१०/प्र.क्र.७९/ पापु-१४
दि.६ मे २०१०, दि.१३ मे २०१० व ५ जून २०१०

३. महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. एससीवाय-०५ /२०१०/प्र.क्र.५४/म-११ ,
दि. १ नोव्हेंबर २०१०

४. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक- टंचाई-१०१०/प्र.क्र.७९/ पापु-१४
दिनांक : ४ नोव्हेंबर २०१०

५. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक- टंचाई-२०१०/प्र.क्र.७८/ पापु-१४
दिनांक : १८ नोव्हेंबर २०१०

६. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्रमांक- टंचाई-१०१०/प्र.क्र.७९/ पापु-१४
दिनांक : २६ नोव्हेंबर २०१०

प्रस्तावना :-

ग्रामीण व नागरी भागातील पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या उपाययोजनांवरील खर्च लेखाशिर्ष २२४५-नैसगिक आपत्ती निवारणासाठी सहाय्य या लेखाशिर्षाखाली, उपलब्ध होणा-या अनुदानातून भागविण्यात येतो.

महसूल व वन विभागाने ग्रामीण व नागरी भागातील पिण्याच्या पाणी टंचाई निवारणार्थ घेण्यात येणाऱ्या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी रु.७५६६. ४६ लक्ष निधी या विभागाकडे वर्ग केला आहे. सदर निधीतून ग्रामीण भागात पाणी टंचाई निवारण कार्यक्रमांतर्गत घेतलेल्या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी एकुण रु. ७५६६.४६ लक्ष पैकी रु.७०४२.६८लक्ष अनुदान या विभागाच्या संदर्भ (४) (५) (६) येथील शासन निर्णयाच्या परिशिष्टामध्ये नमुद केलेल्या सर्व जिल्हाधिकारी यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करुन देण्यात आलेले आहेत. उर्वरित जिल्हाधिकारी कोल्हापुर , नाशिक ,अहमदनगर , नांदेड आणि लातुर यांना रु. ३३५.१५ लक्ष इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :-

ग्रामीण भागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ राबविलेल्या उपाय योजनांवरील खर्च भागविण्यासाठी सोबतच्या परिशिष्टातील स्तंभ क्र. २ मध्ये नमूद केल्यानुसार संबंधित जिल्हाधिकारी यांना रु. ३३५.१५ लक्ष (रुपये तीन कोटी पस्तीस लक्ष पंधरा हजार फक्त) अनुदान अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहेत. सदर अनुदान डिसेंबर २०१० या महिन्यात अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिल्यानुसार मुक्त करुन घेण्यात यावे.

२. जिल्हाधिकारी यांना खालील अटींच्या अधीन राहून अनुदानाचे वाटप करण्यात येत आहे :-

१) संबंधित जिल्हाधिकारी यांनी टंचाई कालावधीमध्ये राबविण्यात आलेल्या सर्व उपाययोजनांवरील प्रत्यक्षात झालेला खर्च व उपलब्ध करुन दिलेला निधी यांचा समतोल साधून अनुदानाचे वाटप करावे. तसेच सदर निधी ज्या प्रयोजनासाठी देण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होत आहे याची जिल्हाधिकारी यांनी खातरजमा करावी.

२) जिल्हाधिकारी यांना उपलब्ध करुन दिलेला निधी ३१ मार्च २०११ पूर्वी खर्ची टाकण्याबाबत कार्यवाही करावी व उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र तात्काळ शासनास सादर करावीत. तसेच दर तीन महिन्याचे विनियोजन लेख्याचे महालेखाकार कार्यालयाकडून प्रमाणित करुन तातडीने शासनास पाठवावे.

३) जिल्हाधिकारी कार्यालयांनी कोषागारातून काढलेल्या रक्कमा कोणत्याही परिस्थितीत अखर्चित राहणार नाहीत याची दक्षता घ्यावी व रक्कमा अखर्चित राहत असल्यास तात्काळ शासनाच्या निदर्शनास आणून देण्यात यावे. तसे न झाल्यास होणा-या आर्थिक अनियमिततेसाठी संबंधित आहरण व संवितरण अधिकारी जबाबदार असेल.

४) जिल्हाधिकारी यांनी उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाचे तात्काळ आदेश निर्गमित करावेत.

३. सदर खर्च, मागणी क्रमांक सी-६ लेखाशिर्ष-२२४५- नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य-०१- अवर्षण -१०२- पिण्याच्या पाण्याचा पुरवठा - १०२ (००) (०१) निकडीच्या पाणी पुरवठा योजना (२२४५००९३) (दत्तमत) (योजनेतर) या लेखाशिर्षाखालील चालू वित्तीय वर्षात (सन २०१०-२०११) खर्च म्हणून दर्शविण्यात यावा. तसेच, दरमहा होणा-या खर्चाचे पत्रक व उपयोगिता प्रमाणपत्रे पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यत या विभागास आणि महसूल व वन विभागास पाठविण्यात यावेत.

४. आहरण व संवितरण अधिका-यांनी कोषागार /उपकोषागार यांजकडे पाठविण्यात येणाऱ्या व बीलासोबत जोडल्या जाणा-या कॉम्पुटर स्लीपमध्ये गौण /उपलेखाशिर्षाचा संगणकयंत्र संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा. तसेच कोषागारातून/उपकोषागारातून आहरीत केलेल्या रक्कमेचा अहवाल शासनास सादर करावा.

५. हे आदेश, महसुल व वन विभागाने वित्त विभागाच्या प्राप्त केलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय शासनाच्या w.w.w.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक **२०१०१२२२२०२४५९००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

सही /-

(प्र.शं.शेटे)

अवर सचिव , महाराष्ट्र शासन

प्रत,

१. प्रधान सचिव, (मदत व पुनर्वसन) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
२. सचिव, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
३. सर्व विभागीय आयुक्त, नाशिक ,पुणे,औरंगाबाद.
४. जिल्हाधिकारी, अहमदनगर , नाशिक , कोल्हापुर ,नांदेड आणि लातुर .
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर , नाशिक , कोल्हापुर ,नांदेड आणि लातुर .
६. जिल्हा पाणी पुरवठा अधिकारी , अहमदनगर , नाशिक , कोल्हापुर नांदेड आणि लातुर .
७. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद,अहमदनगर , नाशिक , कोल्हापुर नांदेड आणि लातुर .
८. जिल्हा कोषागार अधिकारी , अहमदनगर , नाशिक , कोल्हापुर ,नांदेड आणि लातुर .
९. सह संचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नविन प्रशासकिय भवन, ५ वा मजला, मुंबई-३२.(०२ प्रतींसह)
१०. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई-४०० ०२१.
११. अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
१२. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१३. मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,कोंकण भवन,नवी मुंबई.
१४. उपमुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा (सर्व)
१५. महालेखापाल, महाराष्ट्र-१,मुंबई (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता).
१६. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर (लेखा परीक्षा/लेखा अनुज्ञेयता).
१७. कक्ष अधिकारी, व्यय-३ व व्यय-९, अर्थसंकल्प-३ व अर्थसंकल्प-४, वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई.
१८. कक्ष अधिकारी,म-७/म-११/ब-१/पिएसी/पिएसी-१, महसुल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई.
१९. निवड नस्ती, पापु-१४.

.....३

**परिशिष्ट**

**शा.नि. क्र. टंचाई १०१० /प्र.क्र.७९/पापु १४ दि.२२/१२/२०१० अन्वये जिल्हाधिकारी यांना ग्रामीण भागातील पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी लेखाशीर्ष २२४५००९३ खाली उपलब्ध करुन दिलेले अनुदान**

| **जिल्हा** | **जिल्हाधिकारी यांना मंजूर केलेले अनुदान रु.लक्ष** |
|---|---|
| १. | २. |
| नाशिक | १५०.०० (रुपये एक कोटी पन्नास लक्ष फक्त) |
| अहमदनगर | ८०.०० (रुपये ऐंशी लक्ष फक्त) |
| **एकूण नाशिक विभाग** | **२३०.०० (रुपये दोन कोटी तीस लक्ष फक्त)** |
| कोल्हापुर | २९.८९ (रुपये एकोणतीस लक्ष एकोणनव्वद हजार फक्त) |
| **एकूण पुणे विभाग** | **२९.८९ (रुपये एकोणतीस लक्ष एकोणनव्वद हजार फक्त)** |
| नांदेड | ४०.०० (रु. चाळीस लक्ष फक्त) |
| लातूर | ३५.२६ (रु.पस्तीस लक्ष सव्वीस हजार फक्त) |
| **एकूण औरंगाबाद विभाग** | **७५.२६ (रु. पंच्याहत्तर लक्ष** सव्वीस हजार फक्त) |
| **एकूण सर्व** | **३३५.१५. (रुपये तीन कोटी पस्तीस लक्ष पंधरा हजार फक्त)** |

सही/-

(प्र.शं.शेटे)

अवर सचिव महाराष्ट्र शासन